पशुसंवर्धन विभागातील "सयंत्र अभियंता" या संवर्गास राजपत्रित दर्जा व वेतनश्रेणी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. पसंप्र -२०१५/प्र.क्र.४१०/पदुम-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दि. ३० जानेवारी, २०१९

वाचा:- १) शासन निर्णय पाटबंधारे विभाग क्र. सीडीएस १५८२/१५८ (२१५) आ (१०), दि.१६.०४.१९८४
२) शासन निर्णय कृषी व सहकार विभाग क्र. एसईओ १०८४/७५८/प्रशासन-५, दि.०३.०२.१९८७
३) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ नागपूर यांचे आदेश दि.११.०४.२०१८

प्रस्तावना:-

दि.०१.०४.१९८१ पासून पाटबंधारे विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग या दोन्ही विभागांच्या अंतर्गत स्थापत्य, यांत्रिकी, विद्युत यांत्रिकी तसेच शेतकी अभियांत्रीकी क्षेत्रांतील पदांवर कार्यरत असलेल्या पदवीधर व अन्य कनिष्ठ अभियंत्यांना "राजपत्रित अधिकारी वर्ग-२ (कनिष्ठ स्तर)" असा दर्जा दिल्याचे आदेश पाटबंधारे विभागाने संदर्भाधीन निर्णयाद्वारे काढले आहेत. तसेच कृषि व सहकार विभाग (पदुम) अंतर्गत असलेल्या फोरमन सुपरवायझर संवर्गातील पदविकाधारक अभियंत्याना संदर्भाधीन आदेशान्वये "राजपत्रित अधिकारी वर्ग-२ (कनिष्ठ स्तर)" दर्जा देण्यात आला आहे. पशुसंवर्धन विभागातील **"सयंत्र अभियंता"** या संवर्गास जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयाप्रमाणे व कृषि विभागातील फोरमन सुपरवायझर संवर्गातील पदविकाधारक अभियंत्याप्रमाणे राजपत्रित दर्जा व वेतनश्रेणी मिळण्यासाठी श्री. विलास वासुदेव खरे, सयंत्र अभियंता, गोठीत रेत प्रयोग शाळा, नागपूर यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण खंडपीठ, नागपूर येथे मूळ अर्ज क्र.२९०/२००९ दाखल केला. प्रस्तुत प्रकरणी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण खंडपीठ, नागपूर यांनी दि.११.०४.२०१८ रोजी आदेश पारित करुन श्री. खरे यांना उपरोल्लेखीत प्रकरणाप्रमाणे राजपत्रित दर्जा व वेतनश्रेणीचे लाभ देण्याबाबत सहा महिन्यामध्ये गुणवत्तेनुसार निर्णय घेण्याबाबत निर्देश दिले आहेत. मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाचे दि.११.०४.२०१८ च्या आदेशाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल करण्यास प्रकरण योग्य नसल्याबाबत विधी व न्याय विभाग, खंडपीठ नागपूर यांनी अभिमत दिले आहे. त्यामुळे मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण खंडपीठ, नागपूर यांचे दि.११.०४.२०१८ च्या आदेशाची अंमलबजावणी करणे क्रमप्राप्त आहे. सदर वस्तुस्थिती विचारात घेता चौथ्या वेतन आयोगामध्ये न्या. नाईक समितीने कृषी व पदुम विभागाच्या अधिपत्याखालील संचालक, पशुसंवर्धन यांच्या अधिनस्त "सयंत्र अभियंता" या पदास पाटबंधारे विभागातील "कनिष्ठ अभियंता" या पदाची समकक्षता अनुज्ञेय केली आहे. त्यामुळे "संयंत्र अभियंता" या पदास पाटबंधारे विभागाच्या दि.१६.०४.१९८४ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे राजपत्रित दर्जा देणे व वेतनश्रेणीचे लाभ मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई खंडपीठ, नागपूर यांनी मूळ अर्ज क्र. २९०/२००९ मध्ये दि.११.०४.२०१८ रोजी दिलेल्या निर्णयानुसार पशुसंवर्धन विभागाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या सयंत्र अभियंता गट-क" या संवर्गातील पदावर कार्यरत पदवीधारक तसेच खाली दर्शविलेला सेवाकाळ पूर्ण केलेल्या पदवीकाधारक व अर्हतारहित सयंत्र अभियंत्यांना पाटबंधारे विभागाच्या दि.१६.०४.१९८४ रोजीच्या शासन निर्णयानुसार संबंधित "सयंत्र अभियंता" ज्या दिनांकाला पात्र होतील त्या दिनांकापासून त्यांना राजपत्रित दर्जा व तिस-या, चौथ्या, पाचव्या व सहाव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात येत आहे.

| सयंत्र अभियंत्यांची वर्गवारी | राजपत्रित दर्जा मिळण्यास लागणारा आवश्यक सेवाकाळ |
|---|---|
| **अ) ३ वर्षाची पदवीका धारण केलेले सयंत्र अभियंते** | **५ वर्षे** |
| **ब) २ वर्षाची किंवा तत्सम पदविका धारण केलेले सयंत्र अभियंते** | **७ वर्षे** |
| **क) अर्हतारहित सयंत्र अभियंते** | **१० वर्षे** |

१) "सयंत्र अभियंता" या संवर्गातील पदासांठी वेतनश्रेणी रु. ६००-९५० (तिस-या वेतन आयोगानुसार), रु. २०००-३२०० (चौथ्या वेतन आयोगानुसार), रु. ६५००-१०५०० (पा चव्या वेतन आयोगानुसार) रु. ९३००-३४८०० ग्रेड पे रु.४४००/- (सहाव्या वेतन आयोगानुसार) अशी मंजुर करण्यात येत आहे.

२) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, दि.१६.०४.१९८४ नुसार "सयंत्र अभियंता" या पदासाठी तिस-या, चौथ्या, पाचव्या व सहाव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी व तदनुषंगीक लाभ परिगणीत करुन त्याप्रमाणे थकबाकी प्रदान करण्यात यावी.

३) सयंत्र अभियंता यांना उप विभाग तथा इतर कार्यालयात सध्या कनिष्ठ अभियंत्यांना ज्या धर्तीवर नियुक्त करण्यात येते त्या धर्तीवर नियुक्ती/नेमणूक देण्यात यावी. तसेच कनिष्ठ अभियंत्यासाठी असलेली कर्तव्ये, कामे आणि अधिकार सयंत्र अभियंता यांना देखील तुर्त तशीच लागू राहवीत.

२. सदरहू आदेश सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२९१/२०१८/सेवा-९, दि.२३.०१.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३०१७११०१८९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vinod Sopanrao Mendhe

Digitally signed by Vinod Sopanrao Mendhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3dfd984bb7c5aede090473e34b1c93fa9f36d97d56c0cf07812a43c5ca5d6a24, cn=Vinod Sopanrao Mendhe
Date: 2019.01.30 17:21:49 +05'30'

**( वि.सो.मेंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, ½ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र नागपूर/मुंबई
२. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (लेखा व कोषागारे) वित्त विभाग, मंत्रालय (५ प्रती)
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे-७
६. सर्व विभागीय आयुक्त
७. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त, पुणे विभाग, पुणे
८. मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ, नागपूर
९. सर्व संयंत्र अभियंता, कृषी व पदुम विभाग
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
११. निवड नस्ती (पदुम-१)
१२. कार्यासन संग्रहार्थ.